**औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी येथील अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींच्या वसतीगृह इमारत दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: वसगृ- २०२३ /प्र.क्र. ०७ /का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २७ जून, २०२४

**वाचा -**

१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२ मार्च, २०१०,
२) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि.२० डिसेंबर, २०११,
३) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: अविवि-२००९/प्र.क्र.१५(१)/का-८, दि.२७ मार्च, २०१०
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १ एप्रिल, २०२४
५) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण२०१९/प्र.क्र.१०/इमा-२ दि.२५ सप्टेंबर, २०१९
६) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन पत्र क्रमांक- वसगृ -२०२२/प्र.क्र.५८ /का-८ दिनांक: २७ सप्टेंबर, २०२२
७) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०२३/सा.प्र./अल्पसंख्याक /कावि-२३८, दि. आक्टोबर, २०२३

**प्रस्तावना -**

अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींसाठी राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये वसतीगृहे बांधण्याबाबत तसेच विद्यापीठाच्या आवारात वसतीगृहे बांधण्याबाबत संदर्भ क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयांन्वये निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी या संस्थेच्या आवारात अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींकरिता १०० प्रवेश क्षमतेचे वसतीगृह बांधकामास रु. २,०७,०१,२७९/- इतक्या रकमेस संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णायान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.६ येथील शासन पत्रान्वये कळविल्यानुसार जिल्हाधिकारी, परभणी यांनी वसतिगृह दुरुस्तीचा सादर केलेला प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकडे छाननीकरीता सादर केला होता. त्यानुषंगाने सदर वसतिगृहाच्या दुरुस्ती कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी येथील अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींच्या दुरुस्ती कामांसाठी रु.२९,६०,४१५/-(अक्षरी रुपये एकोणतीस लाख साठ हजार चारशे पंधरा फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास याव्दारे पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. वसतीगृहाचे दुरुस्ती कामे सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेमार्फत करुन घ्यावे.
२. निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामांना सुरुवात करु नये.
३. वसतीगृहाच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल जिल्हाधिकारी, परभणी व शासकीय

औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी यांनी शासनास सादर करावा.

४. इमारतीत पाणी गळती होत नाही, हे तपासूनच नंतर काम करणे.

५. काम अंतिम झाल्यावर कामातील बाबींची माहिती शासनास पाठविण्यात यावी.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. सदर कामाबाबतचे निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर शासनास कळवावे .तसेच सदर इमारतीचे दुरुस्ती कामे दि. ३१ डिसेंबर, २०२४ पर्यत पूर्ण करण्यात यावे.

८. विषयांकीत कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, या दृष्टीने दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. वसतिगृहाच्या दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| **Recaptulation Sheet** | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Perticulars Of Scope** | **Amount** |
| 1 | Cost of Work as per Estimate | 24,98,241 |
| | **Total** | 24,98,241 |
| | GST 18 % on total Estimate Cost | 4,49,683 |
| | Labour Charges 0.5 % on total Estimate Cost | 12,491 |
| | **Grant Total** | 29,60,415 |

**३.** यावर होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

**४.** निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

**५.** हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग- पहिला, उप विभाग- पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४(१), १३४(२) आणि १३४ (३) खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२५ सप्टेंबर, २०१९ च्या शासन परिपत्रकातील तरतूदीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२४०६२७१२२९०५८६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MILIND PADMANABH SHENOY

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=a45302e7be40ef2fa6a43ca3b215a6542fe92b8f994959680f52a7ae3a293948, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F493AF30AF7B26C53298AE259841E86E196988EEE98D450625570240B6F3B989, cn=MILIND PADMANABH SHENOY
Date: 2024.06.27 12:41:48 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, परभणी

६. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य , मुंबई
७. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पुर्णा, जि. परभणी
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (इमारती) विभाग, परभणी
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
१२. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१३. निवड नस्ती, कार्यासन-८